**मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, मुंबई यांच्या आस्थापनेवरील १६ अस्थायी पदांना मुदतवाढ देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्र. एमसीटी-२०१७/प्र.क्र.२८/परि-५**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२,
दि. ०५ एप्रिल, २०१७.

<u>वाचा :-</u>
१) शा.नि. गृह विभाग क्र.एमसीटी १२६७/७६९१३-XII, मुंबई दि. १ नोव्हेंबर १९६८
२) शा.नि. गृह विभाग क्र.एमसीटी १२७२/८६९७-XII-B, मुंबई दि. ९ मे १९७४
३) शा.नि. गृह विभाग क्र. एमसीटी ०१७६/३-XXXV-TR,मुंबई ३२ दि. ३० ऑगस्ट १९७७
४) शा.नि. गृह विभाग क्र.एमसीटी ०१८९/७५६ (अ)/परि-७ मुंबई दि. ३१ ऑक्टो. १९९२
५) शा.नि. गृह विभाग क्र. एमसीटी ०९०६/११५४/प्र.क्र.२०९/परि-५ दि. १५ जानेवारी २००७
६) शा.नि. गृह विभाग क्र. एमसीटी ०८०५/९१९/प्र.क्र.१४५/परि-५ दि. २ मार्च २००७
७) शा.नि. गृह विभाग क्र.एमसीटी-२०१५/प्र.क्र.२/परि.-५, दि. २१ जानेवारी, १५
८) शा.नि. गृह विभाग क्र.एमसीटी-२०१६/प्र.क्र.२/परि.-५, दि. ७ एप्रिल २०१६
९) प्रबंधक, मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, मुंबई यांचे क्र.मोअदान्या /आस्था/ १०२/२०१७, दि. ६ फेब्रुवारी २०१७
१०) शासन निर्णय वित्त विभाग क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क. दि. १० फेब्रुवारी २०१७

**<u>प्रस्तावना :-</u>**

मुंबई जिल्हयासाठी एकूण ८ मोटार अपघात दावा न्यायाधिकरणे स्थापन करण्यात आलेली असून सदर न्यायाधिकरणाच्या आस्थापनेवर एकूण ११९ पदे निर्माण केलेली आहेत. उपरोक्त संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयानुसार ३ पदे, संदर्भ क्र. २ च्या शासन निर्णयानुसार १३ पदे, संदर्भ क्र.३ च्या शासन निर्णयानुसार ७ पदे, संदर्भ क्र.४ च्या शासन निर्णयानुसार ३४ पदे व संदर्भ क्र. ५ च्या शासन निर्णयानुसार ३१ पदे संदर्भ क्र. ६ च्या शासन निर्णयानुसार १५ पदे अशी एकूण १०३ पदे स्थायी करण्यात आली आहेत. उर्वरित १६ पदे अस्थायी असून सदर पदांना संदर्भ क्र. ७ च्या शासन निर्णयानुसार दि. २१ जानेवारी २०१६ नुसार दि. १ मार्च २०१६ ते २८ फेब्रुवारी २०१७ (१ वर्ष) पर्यंत मुदतवाढ देण्यात आली होती. सदर १६ पदांची मुदत दि. २८ फेब्रुवारी २०१७ रोजी संपुष्टात येत आहे. प्रबंधक, मोटार अपघात दावा न्यायाधियकरण, मुंबई यांनी आता एकूण १६ पदांना मुदतवाढ देण्याबाबतचा प्रस्ताव संदर्भ क्र. ९ येथील पत्रान्वये शासनास सादर केला असून सदर पदांना मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, मुंबई यांच्या आस्थापने वरील खालील १६ अस्थायी पदांना दि. १ मार्च २०१७ ते ३० सप्टेंबर २०१७ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे. सदर मुदतवाढ ही न्यायाधिकरणाकडे प्रलंबित असलेले दावे त्वरीत निकाली काढणे, निकाली काढलेल्या दाव्यांचे माहे मे २०१७ आणि ऑगस्ट २०१७ अखेरचे विवरणपत्र शासनास सादर करणे तसेच मार्च २०१६ रोजी प्रलंबित असलेल्या दाव्यातील ५० टक्के प्रलंबित दावे निकाली काढल्याचे दिसून न आल्यास पुढील मुदतवाढ मिळणार नाही या अटीच्या अधिन राहून देण्यात येत आहे.

| अ.क्र. | पदाचे नांव | पद संख्या | पदे निर्माण केलेल्या शासन निर्णयाचा क्रमांक व दिनांक |
|---|---|---|---|
| १. | सदस्य | २ | शा.नि.गृह विभाग क्र.एमसीटी/०९०१/ ११६५/११७-अ/परि-५ दि. २.१२.२००३ |
| २. | शिरस्तेदार | २ | वरीलप्रमाणे. |
| ३. | उच्चश्रेणी लघुलेखक | १ | वरीलप्रमाणे. |
| ४. | शिपाई | २ | वरीलप्रमाणे. |
| ५. | हवालदार | १ | शा.नि.गृह विभाग क्र.एमसीटी/७९०१/ ११६५/११७-ब/परि-५ दि. २.१२.२००३ |
| ६. | बेलिफ | २ | वरीलप्रमाणे. |
| ७. | दुभाषिक | १ | शा.नि.गृह विभाग क्र.एमसीटी/०९०१/ ११६३/सीआर-११७-क/परि-५ दि. २०.६.२००२ |
| ८. | लिपिक-टंकलेखक | २ | वरीलप्रमाणे. |
| ९. | सहायक अधिक्षक | १ | वरीलप्रमाणे. |
| १० | लिपिक टंकलेखक | २ | शा.नि.गृह विभाग क्र.एमसीटी/०१८२/२ /सीआर-८९/परि-५, दि. ३०.९.१९८५. |
| **एकूण पदे** | | **१६** | |

२. राज्यातील मोटार अपघात दावा न्यायाधिकरणांना शासन निर्णय गृह विभाग क्र. एमसीटी-०२०४/१७५५/सीआर-२१/परि-५, दि. २५.६.२००४ अन्वये वित्त विभाग, शासन निर्णय दि. १०.०९.२००१ च्या तरतूदीतून म्हणजेच पदाच्या आढावा घेण्यापासून वगळण्यात आले आहे. त्यामुळे पदांचा आढावा घेण्याची आवश्यकता नाही, मात्र नवीन पद निर्मितीस शासनाची मान्यता घ्यावी लागेल.

३. या बाबीवरील होणारा खर्च "मागणी क्र. बी-३, २०४१, वाहनांवरील कर, (००) ८००, इतर खर्च, (००) (०१) मोटार अपघात दावा न्यायाधिकरण (२०४१ ०१२५)" या लेखाशिर्षाखालील सन २०१७-२०१८ या आर्थिक वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

४. वित्त विभाग, शासन निर्णय क्र. पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ. पु. क., दि. १० फेब्रुवारी २०१७ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१७०४०५११५५४४७७६२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात आला आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

Kadam Dattatray Hanmant

Digitally signed by Kadam Dattatray Hanmant
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=7fee1bbc15b71aa23bf3ffa4e468df749270 3428e9ad65c6cd79299927331e6f, cn=Kadam Dattatray Hanmant
Date: 2017.04.05 11:55:59 +05'30'

(द. ह. कदम)
कार्यासन अधिकारी, गृह विभाग

**प्रति,**

१. अध्यक्ष, मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, मुंबई.
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता / लेखा परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.

३. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५. प्रबंधक, मोटार अपघात दावा न्यायाधिकरण, मुंबई.
६. वित्त विभाग (व्यय-८/ वित्तीय सुधारणा/आ.पु.क.), मंत्रालय, मुंबई.
७. अवर सचिव, (बीयुडी-१/ परिवहन-४), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
८. निवड नस्ती / परिवहन-५.